शासकीय अधिकाऱ्यांना/कर्मचाऱ्यांना असामान्य कामानिमित्त आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक एसआरव्ही-१०९३/प्र.क्र. ९३/आठ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

दिनांक : १७ एप्रिल, १९९३

वाचा :- [१] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०७२/डी, दिनांक ११ फेब्रुवारी, १९७४.

[२] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही १०७६/१३, दिनांक १० ऑगस्ट, १९७६.

[३] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- एसआरव्ही १०८४/के.नं. ६/आठ, दिनांक १९ फेब्रुवारी, १९८४.

[४] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०९०/प्र.क्र. ३९७/आठ, दिनांक २२ नोव्हेंबर, १९९०.

परिपत्रक :- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०९०/प्र.क्र. ३९७/आठ, दिनांक २२ नोव्हेंबर, १९९० अन्वये विहीत केलेले विवरणपत्र सुधारण्याचा प्रश्न या विभागाच्या विचाराधीन होता. त्याबाबत विचार करून त्यानुसार सोबतचे सुधारीत विवरणपत्र विहित करण्यात येत आहे.

२. सर्व मंत्रालयीन विभाग व विभाग प्रमुखांनी, आगाऊ वेतन वाढीसंबंधीचे प्रस्ताव तपासतांना उपरनिर्दिष्ट विवरण पत्रात प्रस्ताव असल्याची खातरजमा करून असे प्रस्ताव विचारात घ्यावेत. तसेच वर्ग १ व २ च्या अधिकाऱ्यांना, आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्याबाबतचे प्रस्ताव शासनाकडे पाठवितांना या परिपत्रकान्वये विहित केलेल्या विवरणपत्रातील माहिती, संबंधीत अधिकाऱ्याच्या अहवाल गोपनीय अहवालाच्या नकलांसह पाठवावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(स्वाक्षरी)

[ प.मा. जोशी ]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.

एसवी/१५.४. [कृ.मा.प.]

# विवरणपत्र

अत्युत्कृष्ठ कामानिमित्त आगाऊ वेतनवाढ मंजूर करण्याबाबत.

१. शासकीय अधिकारी/कर्मचारी याचे नाव :

२. जन्मतारीख :

३. [अ] सध्या धारण केलेले पद :
[ब] या पदाची वेतनश्रेणी :
[क] सध्याचे मूळ वेतन :
[ड] हे पद नियमितरित्या धारण केल्याची [सेवाप्रवेश नियमानुसार व विहित मार्गाने झालेल्या नियुक्तीची] तारीख :

४. [अ] ज्या पदासाठी आगाऊ वेतनवाढीचा विचार करता येईल ते पद :
[ब] त्या पदाची वेतनश्रेणी :
[क] त्या पदावरील नियमित [सेवाप्रवेश नियमानुसार व विहित मार्गाने झालेल्या] नियुक्तीचा दिनांक.
[ड] आगाऊ वेतनवाढी ज्या दिनांकापासून मंजूर करण्यात येतील त्या दिनांकास मूळ वेतन. : दि. १ ऑक्टोबर

५. यापूर्वी आगाऊ वेतनवाढ मंजूर केली असल्यास कोणत्या पदामध्ये व त्याचा दिनांक [ होय किंवा नाही हे स्पष्ट करण्यात यावे, असल्यास त्याचा दिनांक देणे आवश्यक आहे. ] :

६. विभागीय चौकशी चालू असल्यास अथवा चालू करण्याचे प्रस्तावित असल्यास ते नमूद करावे. :

कार्यालय प्रमुख/ विभाग प्रमुख/
उप सचिव, महाराष्ट्र शासन.